**महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान**
**मुदखेड शहर पाणी पुरवठा योजनेस**
**प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्र.सुनिअ-२००९/प्र. क्र.२२८/पापु२२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : २६ऑगस्ट,२००९**

**वाचा:-** १. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. नापापु १०००/प्र.क्र.४१०/पापु२२, दि. १५ जुलै, २०००
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. नापापु२००८/प्र.क्र.१/पापु२२, दि. २२, ऑक्टोबर, २००८
३. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. नापापु२००८/प्र.क्र.१९८/पापु२२, दि. २३ डिसेंबर, २००८
४.मुख्याधिकारी, नगरपरिषद, मुदखेड यांचे पत्र दि.१०.०८.२००९
५. जिल्हाधिकारी, नांदेड यांचे पत्र दि.११.०८.२००९
६. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, **नांदेड,** यांचे पत्र क्र.२०६१, दि.२१.०८.२००९

**प्रस्तावना**

१. महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेचे ५० वर्ष सन २०१० मध्ये पूर्ण होत आहे. त्या निमित्ताने राज्याच्या स्थापनेच्या सुवर्णजयंती वर्षापर्यंत नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण,शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापना संदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दिष्ट निर्धारित करुन ते राज्याच्या स्थापनेच्या सुवर्णजयंती वर्षापर्यंत साध्य करण्यासाठी महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्याचा निर्णय संदर्भांकित दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये घेतलेला आहे.

२. नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, स्वच्छता व घनकचरा व्यवस्थापना संदर्भात प्रर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे तसेच दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट-१ मध्ये विहित केलेल्या विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करणा-या नागरी संस्थाच्या पाणीपुरवठा व मलनि:सारण योजनासाठी वाढीव अनुदान उपलब्ध करुन देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार संदर्भांकित शासन निर्णय दि.१५ जुलै,२००० अन्वये नागरी पाणी पुरवठा व मलनि:सारण योजनासाठी विहित केलेल्या वित्तीय आकृतीबंधात संदर्भांकित दि.२२ ऑक्टोबर,२००८ च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली आहे. सदर वाढीव अनुदान अनुज्ञेय होण्यासाठी नागरी संस्थांना महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानामध्ये भाग घेणे, दि.२२.१०.२००८ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट-१ मधील विहित सुधारणात्मक उपाययोजना स्विकारणे व त्या पूर्ण करणे तसेच वाढीव अनुदान प्राप्त करण्यासाठी सर्वसाधारण सभेचा ठराव करुन राज्य शासनाशी करार करावयाचा आहे.

३. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नांदेड यांनी **मुदखेड** शहरामध्ये पाणीपुरवठा सुरळीत होण्यासाठी योजनेच्या कामामध्ये सर्वेक्षण, इंटेकवेल, कनेक्टींग मेन, इन्सपेक्शन वेल, जॅकवेल, ॲप्रोच ब्रिज, ॲप्रोच बंड, पंपिंग मशिनरी, उर्ध्ववाहिनी, उंच पाण्याची टाकी, वितरण वाहिनी, भूसंपादन, योजनेची चाचणी, चालू योजनेची दुरुस्ती इ. कामाचा प्रस्ताव तयार केला असून संदर्भांकित दिनांक २१.०८.२००९ रोजीच्या पत्रान्वये मान्यता देण्याची विनंती केली आहे. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानामध्ये भाग घेणे, दिनांक २२.१०.२००८ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट-१ मधील विहित सुधारणात्मक उपाययोजना स्विकारणे, व त्या पूर्ण करणे तसेच वाढीव

अनुदान प्राप्त करण्यासाठी **मुदखेड नगरपरिषदेने** ठराव करुन परिशीष्ट - १ मधील सुधारणांच्या सद्य:स्थितीसह शासनासोबत करार केला आहे.

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान दि.२३ डिसेंबर २००८ च्या शासन निर्णयान्वये स्थापन केलेल्या राज्यस्तरीय सनियंत्रण व समन्वय समितीने **मुदखेड नगरपरिषेदेच्या** उपरोक्त प्रस्तावास मंजूरी दिलेली आहे.

उपरोक्त बाबीचा विचार करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत **मुदखेड** शहर पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत **मुदखेड** शहर पाणी पुरवठा योजनेच्या **रु.११,३२,४०,५००/-** ढोबळ किंमतीच्या योजनेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. **मुदखेड** शहरासाठी मंजूर केलेली उपांगे व त्यांचे किंमतीचे विवरण खालील प्रमाणे आहे.

| अ.क्र. | उपांगाचे नांव | किंमत | |
|---|---|---|---|
| योजनेची कामे २. | १. सर्वेक्षण | रु. | १,००,०००/- |
| | २. इंटेकवेल | रु. | ४,८४,६००/- |
| | ३. कनेक्टींग मेन | रु. | १७,४९,०००/- |
| | ४. इन्सपेक्शन वेल | रु. | २,७६,०००/- |
| | ५. जॅकवेल | रु. | ४३,२१,१००/- |
| | ६. ॲप्रोच ब्रिज | रु. | ७,४८,०००/- |
| | ७. ॲप्रोच बंड | रु. | ८,५०,०००/- |
| | ८. पंपिंग मशिनरी | रु. | ७२,००,६००/- |
| | ९. उर्ध्ववाहिनी | रु. | ६,०६,१७,७००/- |
| | १०. उंच पाण्याची टाकी | रु. | २२,४८,२००/- |
| | ११. वितरण वाहिनी (एचडीपीई पाईपसह) | रु. | १,२९,५२,८००/- |
| | १२. किरकोळ कामे | रु. | ५२,००,०००/- |
| | १३. योजनेची चाचणी | रु. | २,००,०००/- |
| | १४. मुळ योजनेची दुरुस्ती | रु. | ३,००,०००/- |
| | **एकूण** | **रु.** | **९,७२,४८,०००/-** |
| | **भाववाढ** | रु. | २०,४२,२०८/- |
| | **एकूण निव्वळ किंमत** | **रु.** | **९,९२,९०,२००/-** |
| | **ई.टी.पी. ७%** | रु. | ६९,५०,३००/- |
| | **एकूण** | **रु.** | **१०,६२,४०,५००/-** |
| सुधारणांची कामे | ग्राहक सर्वेक्षण, पाणी लेखापरीक्षण, उर्जा लेखापरीक्षण, फ्लो मिटर बसविणे , हॅड्रोलिक मॉडेलिंग, जीआयएस मॅपिंग, बिलींग व वसुली संगणकीकरण. | रु. | ७०,००,०००/- |
| | **एकूण ढोबळ किंमत** | **रु.** | **११,३२,४०,५००/-** |

**२. मुदखेड शहर पाणी पुरवठा योजनेचा वित्तीय आकृतीबंध खालीलप्रमाणे राहील.**

| अ.क्र. | नागरी संस्थेचे नांव व वर्ग | योजनेची किंमत | अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेचा सहभाग (१०%) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ६ |
| १. | **मुदखेड** नगरपरिषद, **क** वर्ग | **रु. ११,३२,४०,५००/-** | **रु.१०,१९,१६,४५०/-** | **रु. १,१३,२४,०५०/-** |

**३. मुदखेड शहर पाणी पुरवठा योजनेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.**

१. **महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाच्या** शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-१ मधील चारही विषयांशी संबंधीत असलेल्या सुधारणा विहीत मुदतीत पूर्ण करणे **मुदखेड नगरपरिषदेस** बंधनकारक राहील. या सुधारणा करण्याबाबत नगरपरिषदेने केलेली सुरुवात आणि सुधारणांचे टप्पानिहाय साध्य यांचा आढावा घेऊनच या पाणी पुरवठा योजनेस अनुज्ञेय अनुदान देण्यात येईल.

२. **मुदखेड शहर** पाणी पुरवठा योजनेसाठी अनुदान प्राप्त करुनही विहित सुधारणांची प्रक्रिया सुरु केली नाही किंवा विहित वेळी सुधारणा पूर्ण केल्या नाही तर **मुदखेड नगरपरिषदेच्या** योजनेची मंजूरी रद्द करण्यात येईल. तसेच वितरीत केलेले अनुदान वसुल करण्यात येईल. त्याचबरोबर भविष्यात **मुदखेड नगरपरिषदेच्या** पाणी पुरवठा किंवा मलनिःसारण प्रकल्प मंजूरीचा विचार करण्यात येणार नाही.

३. **मुदखेड शहर पाणी पुरवठा** योजनेसाठी सुधारित वित्तीय आकृतीबंधानुसार त्यांच्या आर्थिक सहभागापोटी उभारलेला निधी विचारात घेऊन त्या प्रमाणात राज्य शासनाव्दारे अनुदानाचे वितरण करण्यात येईल.

४. दि.२२ ऑक्टोबर,२००८ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट-१ मधील विहित सुधारणात्मक कार्यवाहीसाठी निश्चित केलेले उद्दिष्ट व त्याची कालमर्यादा लक्षात घेऊन **मुदखेड नगरपरिषदेने** कृती आराखडा तयार करावा.

५. **मुदखेड नगरपरिषदेने** परिशिष्ट-१ मधील सुधारणाबाबत निश्चित उद्दिष्टांची केलेली पूर्तता तपासूनच शासनाकडून या योजनेसाठी अनुदानाचा पुढील हप्ता वितरीत करण्यात येईल. अपेक्षित सुधारणा **मुदखेड नगरपरिषदेने** केल्या नसल्यास अनुदानाचा हप्ता वितरीत करण्यात येणार नाही.

६. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत मंजूर होणा-या पाणी पुरवठा व मलनिःसारण योजनेसाठी राज्य शासनाकडून प्राप्त होणारे अनुदान तसेच **मुदखेड नगरपरिषदेचा** आर्थिक सहभाग राष्ट्रीयकृत बँकेमध्ये स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील.

७. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत मंजूर होणा-या पाणी पुरवठा व मलनिःसारण योजनेवरील खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र तसेच लेखापरीक्षण सादर करणे **मुदखेड न.प.स** अनिवार्य राहील.

८. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत प्रकल्प मंजूर करुन वाढीव अनुदान मान्य करण्यासाठी स्थापन राज्यस्तरीय संनियंत्रण व समन्वय समितीचे निर्णय **मुदखेड नगरपरिषदेस** अनिवार्य राहतील.

९. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाच्या शासन निर्णय दि.२२.१०.२००८ च्या परिशिष्ट-१ मधील नागरी पाणीपुरवठा, मलनिःसारण, स्वच्छता व घनकचरा व्यवस्थापना संदर्भात विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा तसेच शासन निर्णयातील तरतूदी **मुदखेड नगरपरिषदेस** अनिवार्य राहतील. शासनाबरोबर करावयाच्या करारासह जोडावयाच्या उपरोक्त परिशिष्ट-१ मधील वेळोवेळी केलेल्या सुधारणाची सद्यस्थिती **मुदखेड नगरपरिषदेने** शासनास उपलब्ध करुन द्यावी.

१०. योजना स्वयंसंतुलित होण्याकरिता **मुदखेड नगरपरिषदेने** पाणीपट्टीत आवश्यक ती वाढ वेळोवेळी करावी. तसेच या योजनेवर होणारा देखभाल व दुरुस्तीचा खर्च व मिळणारे उत्पन्न यांचा हिशेब नगरपरिषदेने स्वतंत्रपणे ठेवावा.

११. नगरपरिषदेने संभाव्य खर्च, संभाव्य उत्पन्नापेक्षा कमी होईल याबाबत आर्थिक नियोजन करुन कराच्या वसुलीच्या प्रमाणात वाढ करण्याचा प्रयत्न करावा.

१२. नगरपरिषदेने या योजनेसाठी त्याचा आर्थिक सहभाग भरण्यासाठी व योजनेच्या देखभाल व दुरुस्तीसाठी पुरेसा निधी उपलब्ध व्हावा म्हणून उत्पन्न वाढविण्याचा प्रयत्न करावा.

१३. ही योजना पूर्ण झाल्यानंतर ती चालविण्यासाठी राज्य शासनाकडून कोणतेही आर्थिक सहाय्य मिळणार नाही.

१४. सदर योजनेचा महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सन २००९-१० च्या वार्षिक कृती आराखडा व मासिक प्रगती अहवालात समावेश करुन हा मासिक प्रगती अहवाल शासनास पाठवावा.

**१५**. सक्षम अधिका-याची तांत्रीक मंजूरी घेतल्यानंतर कामास सुरुवात करावी.

४. **मुदखेड शहर जि.नांदेड,** पाणीपुरवठा योजनेचा खर्च मागणी क्रमांक वाय २, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, १९१, स्थानिक संस्था, नगरपालिका इत्यादिंना सहाय्य-राज्य योजना (०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनिःसारण योजनांसाठी सहायक अनुदान, (२२१५ १६४७) ३१, सहाय्यक अनुदान, (वेतनेतर), या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व त्या खालील मंजूर तरतुदीतून भागवावा.

५. संदर्भाकिंत शासन निर्णय दिनांक २२ ऑक्टोंबर,२००८ मधील परिच्छेद ५.२ मध्ये नमूद केल्यानुसार अनुदानाचे वितरण सुधारांशी निगडीत असून त्याअनुषंगाने टप्प्याटप्याने वितरीत करावयाचे आहे. त्यानुसार पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत या योजनेअंतर्गत प्रत्येक्ष अनुदान वितरणाचे आदेश वेळोवेळी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास देण्यात येतील. त्या शासन आदेशाच्या अनुषंगाने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने अनुदान वितरीत करावे.

६. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक संकेतांक २००९०८२६१७०४०७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(ल.गो. ढोके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई
६. महालेखापाल-१ मुंबई
७. महालेखापाल-२ नागपूर.
८. संचालक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
९. संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
१०. विभागीय आयुक्त, महसूली विभाग, औरंगाबाद
११. जिल्हाधिकारी, नांदेड
१२. उप संचालक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, नांदेड
१३. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण औरंगाबाद.
१४. संचालक, लेखाकोषागार, मुंबई.
१५. अधिक्षक अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण म.नि.सं.सं.कक्ष, ठाणे.
१६. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नांदेड
१७. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, नांदेड
१८. अध्यक्ष/मुख्यधिकारी, नगरपरिषद मुदखेड जिल्हा नांदेड
१९. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
२०. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नांदेड
२१. जिल्हा प्रकल्प अधिकारी, नगरपालिका प्रशासन, जिल्हाधिकारी कार्यालय, नांदेड
२२. वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, पा.पु.व स्व.विभाग, मंत्रालय,मुंबई.
२४.निवडनस्ती पापु-२२